**शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थातील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन पूरकपत्र क्रमांक : एडीआर-२०१६/प्र.क्र.७१/तांशि-६**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २७ मार्च, २०१७.

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र.एडिआर-२००९/सीआर-१७२/०९/तांशि-६, दि.१६.८.२०१०.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.सेनिवे-१००९/प्र.क्र.३३/सेवा-४, दि.३०.१०.२००९.
३) शासन शुध्दिपत्रक, वित्त विभाग क्र.सेनिवे-१००९/प्र.क्र.३३/सेवा-४, दि.१५.१२.२००९.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई यांचे पत्र क्र.Pension Misc./Ch-३/६०५१६०५६/६०३८११२९, दि.०१.०१.२०१४.
५) कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.अेओ/डेस्क-पाच/२०१६/१४४, दि.२४.१.२०१७.

**प्रस्तावना :**

कला संचालनालयाच्या अखत्यारितील ३१ शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.१६.८.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये अंशराशीकरणाची तरतूद करण्यात आलेली नाही.

शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थांमधून सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांची सुधारित सेवानिवृत्तीवेतन विषयक प्रकरणे महालेखापाल कार्यालयाकडे मंजूरीसाठी सादर केली असता महालेखापाल कार्यालयाने सदर कर्मचाऱ्यांनी अंशराशीकरणासाठी दिलेला विकल्प संदर्भ क्र.३ येथे नमूद वित्त विभागाच्या दि.१५.१२.२००९ रोजीच्या शासन शुध्दिपत्रकाप्रमाणे दि.३०.३.२०१० रोजी पर्यंत सादर केलेला नसल्याच्या कारणास्तव अंशराशीकरणाची ११ प्रकरणे नामंजूर केली आहेत. त्या अनुषंगाने महालेखापाल कार्यालयाने संदर्भ क्र.४ येथे नमूद दि.१.१.२०१४ रोजीच्या पत्रान्वये वित्त विभागाच्या दि.१५.१२.२००९ रोजीच्या शासन निर्णयातील अंशराशीकरणाच्या विकल्पाबाबतची दि.३०.३.२०१० ही cutoff date रद्द करण्यात आल्यानंतर प्रस्तूत प्रकरणांचा विचार करण्यात येईल, असे कळविले आहे. या पार्श्वभूमीवर, संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.१६.८.२०१० रोजीच्या शासन निर्णयास पूरकपत्राव्दारे अंशराशीकरणाबाबतची तरतूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन पूरकपत्र :**

कला संचालनालयाच्या अखत्यारितील ३१ शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबतच्या

संदर्भ क्र.१ येथे नमूद दि.१६.८.२०१० रोजीच्या शासन निर्णयास खालीलप्रमाणे पूरकपत्र जोडण्यात येत आहे.

"शासन निर्णय, वित्त विभाग क्र.सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा-४, दि.३० ऑक्टोबर, २००९ मधील परिच्छेद-८ मध्ये नमूद निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरणाबाबतच्या तरतुदी कला संचालनालयाच्या अखत्यारितील शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार लागू करण्यात येत आहेत. शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्थांतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्याने निवृत्तीवेतनाच्या अंशराशीकरणाबाबतचा विकल्प तो जेथून सेवानिवृत्त झाला असेल त्या विभाग/कार्यालय प्रमुखाकडे दिनांक ३१ डिसेंबर, २०११ पर्यंत सादर करावा. विकल्प विहीत मुदतीत सादर न केल्यास सदर दि.३० ऑक्टोबर, २००९ रोजीच्या शासन निर्णयातील ८.२(अ) प्रमाणे अंशराशीकरणाची परिगणना करण्यात येईल."

२. हे शासन पूरकपत्र वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३३/१७/सेवा-४, दि.१६.२.२०१७ अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन पूरकपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१६३०३६४६०८ असा आहे. हे पूरकपत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd66db73425a9730e4074ae475eb26788ae32a45d13639a02fcf2ffbd43272ff, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2017.03.29 11:34:27 +05'30'

**( का. रा. पिळणकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. प्र.संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता) नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (कला संचालकांमार्फत)
७. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. वित्त विभाग (सेवा-४), मंत्रालय, मुंबई-३२.
९. संबंधित शासनमान्य अशासकीय अनुदानित कला संस्था (कला संचालकांमार्फत)
१०.निवड नस्ती, तांशि-६.

*****